शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्प, ता. व जि. जळगाव - प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०१०/८६५/( प्र.क्र.२९३/१०)/ म.प्र.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०१६.**

संदर्भ :- १) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचा निर्णय क्र.तापाविम/कासं/प्रवि-१/नवीन प्रमा-३/१९९९, दि.०६/०४/१९९९.

२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव यांचे पत्र क्र.मुअ/तापाविम/प्रशा-५/शेळगाव/सुप्रमा/५६१७/२०१०,दि.२०/१०/२०१०.

३) कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.तापाविम/प्रशा-५/११०५/सन २०१३, दि.२३/०२/२०१३.

**प्रस्तावना:-**

शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्प या योजनेअंतर्गत जळगाव जिल्हयातील तापी नदीवर मौजे शेळगाव गावाजवळ ६२४ मीटर लांबीचे माती धरण व ४१९.६५ मीटर लांबीचे संधानकामध्ये उत्सारीत भाग असे एकूण १०४३.६५ मी.लांबीचे बॅरेज बांधण्याचे प्रस्तावित आहे. उत्सारीत भागामध्ये १८.३० मीटर X १६.७६ मीटरचे एकूण १८ वक्राकार दरवाजे प्रस्तावित आहेत.

सदर प्रकल्पाद्वारे तापी खोऱ्यामध्ये महाराष्ट्रास अनूज्ञेय असणाऱ्या १९१ अ.घ.फू.पाणी वापरापैकी ४.५ अ.घ.फू. पाणी वापर होणार आहे. यावल तालुक्यातील ९१२८ हेक्टर सिंचन क्षेत्र (I.C.A.) लाभ धारकांनी त्यांची सहकारी पाणी वापर संस्था स्थापन करून त्यांच्या स्वखर्चाने उपसा सिंचनाद्वारे भिजवण्याचे प्रस्तावित आहे. प्रकल्पाच्या एकूण १२७.५२९ द.ल.घ.मी.(४.५०२ अ.घ.फू.) पाणी वापरापैकी ८७.५९१ द.ल.घ.मी. (३.०९२ अ.घ.फू.) पाणी सिंचनासाठी, १६.८७५ द.ल.घ.मी. (०.५९६ अ.घ.फू.) पिण्याच्या पाणी पुरवठ्यासाठी, ६.८७५ द.ल.घ.मी.(०.२४३ अ.घ.फू.) औद्योगिक वापरासाठी व बाष्पीभवन व्यय १६.१८८ द.ल.घ.मी.(०.५७१ अ.घ.फू.) असा होणार आहे. तापी नदीवरील शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्पाचे लाभक्षेत्र हे यावल तालुक्यातील डार्कझोन क्षेत्रातील असून या प्रकल्पामूळे यावल तालुक्यातील १९ गावांना सिंचनाचा लाभ मिळणार आहे. तसेच प्रकल्पामूळे जळगाव औद्योगिक वसाहतीचा, भुसावळ नगरपालिका व परिसरातील गावांचा पिण्याच्या पाण्याचा व औद्योगिक पाणी वापराचा प्रश्न सुटणार आहे.

शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्पास संदर्भ क्र.१ नुसार सन १९९७-९८ चे दरसूचीवर आधारीत रू.१९८.०६ कोटी (रूपये एकशे अठ्यान्नव कोटी सहा लक्ष फक्त) इतक्या रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे संदर्भ क्र.२ अन्वये सन २००९-१० चे दरसूचीवर आधारीत रु.१०६८.०७ कोटी किंमतीचा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर करण्यात आला होता. मात्र वित्त विभागाने उपस्थित केलेल्या शेऱ्यांच्या अनुषंगाने प्रस्तावात नव्याने अंतर्भूत करण्यात आलेल्या उपसा सिंचन योजनेची किंमत वगळून कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगावचे संदर्भ क्र.३ नुसार जल संपदाचे सन २०११-१२ चे दरसूची व सार्वजनिक बांधकाम विभागाची २०१२-१३ ची दरसूचीवर आधारित रू.६९९.४८ कोटी किंमतीचा

प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्यतेस्तव शासनास सादर केला आहे. प्रकल्पाचे लाभ व्यय गुणोत्तर २.४३ येत असून प्रकल्प मापदंडात बसतो

रु.१९८.०६ कोटी च्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तुलनेत प्रथम सुधारीत प्रकल्प अहवालाची किंमत रु.५०१.४२ कोटीने जास्त आहे. किंमतवाढीची प्रमुख कारणे पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | बाब | वाढ (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | दरसूचीतील वाढीमुळे | १४६.६७ |
| २ | भूसंपादन किंमतीतील वाढ | ७८.६० |
| ३ | संकल्पचित्रातील बदलामुळे झालेली वाढ | ८४.५६ |
| ४ | जादा दराने निविदा स्विकृती | ५.३५ |
| ५ | इतर कारणे (अनुषंगिक खर्चासह) | १८६.२४ |
| | **एकुण वाढ** | **५०१.४२** |

तापी खोऱ्यातील राज्याच्या हिश्याचे १९१.४० अ.घ.फू. अनुज्ञेय पाणी वापरातील ४.५० अ.घ.फू. पाणी वापर या प्रकल्पातून होणार आहे.सद्या हे पाणी विनावापर गुजरात मध्ये वाहून जाते. त्यामुळे सदर पाण्याचा वापर होण्याच्या दृष्टीने या प्रकल्पाच्या प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने सदर प्रस्ताव दि.१४/१०/२०१६ रोजी च्या व्यय अग्रक्रम समितीच्या पुढे विचारार्थ ठेवला असता व्यय अग्रक्रम समितीने प्रस्ताव मा. मंत्रीमंडळासमोर ठेवण्याच्या सूचना केल्या. मा. मत्रीमंडळाने प्रकल्पाच्या किंमत वाढीची कारणे, प्रकल्पाची सद्य:स्थिती व प्रकल्प पूर्ण करण्याची निकड विचारात घेऊन प्रस्तावास मान्यता दिली.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासन आता या निर्णयाव्दारे तापी खोऱ्यातील शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्पाच्या सन २०११-१२ च्या दरसूची व सार्वजनिक बांधकाम विभागाची २०१२-१३ ची दरसूचीवर आधारीत रु.६९९.४८ कोटी (रुपये सहाशे नव्यान्नव कोटी अठ्येचाळीस लक्ष फक्त ) इतक्या किंमतीच्या प्रथम सुधारीत प्रकल्प अहवालास प्रशा़सकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु.६२०.५८ कोटी (रुपये सहाशे वीस कोटी अठ्ठावन लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ व रु.७८.९० कोटी (रुपये अठयाहत्तर कोटी नव्वद लक्ष फक्त) आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी तरतूद आहे. सोबत **तक्ता क्र.१** मध्ये उपशिर्षवार सुधारीत तरतूदींचा गोषवारा दिलेला आहे.

२. या योजनेस प्रदान केलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनुक्रमांक ०४ / २०१६ वर नोंदवण्यात आली आहे.

३. सदर प्रकल्पाचे उर्वरित काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतूदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च मागणी क्रमांक- आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) योजनांतर्गत, (०२) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१-एच ७६३) या लेखाशिर्षाखाली टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५.१) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वयी करण्याच्या विविध टप्यावर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

५.२) या प्रकल्पाबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू ठेवावी. प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही.

५.३) प्रकल्पाचे काम जून, २०१९ पर्यंत पूर्ण करण्यात यावे .

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.२०४/का.१४३४ दि.१२/१२/२०१३, वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.२३३/२०१६/व्यय-१२, दि.२९/०९/२०१६ व दि.१४/१०/२०१६ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीतील अभिप्रायानुसार व दि.१८/१०/२०१६ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०१६३७३७०५२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Arjunrao Kosare

Digitally signed by Sharad Arjunrao Kosare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=EE AND UNDER SECRETARY, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05feaaf7bd630f771059a9456120cce7272c9feb25bd346ca1debdd0f08fce23, cn=Sharad Arjunrao Kosare
Date: 2016.11.30 16:45:38 +05'30'

**सहपत्र :- तक्ता क्र.१**

**( श.अ.कोसारे )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१५) उपसचिव (मो.प्र-१/ मो.प्र-२/जसं/निवसं), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधिक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव.
१८) कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग क्र.२, जळगाव
१९) वित्त विभाग ( व्यय-१२/ अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

## तक्ता क्रमांक-१

**शेळगाव बॅरेज मध्यम प्रकल्प, ता.व जि.जळगाव**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१०/८६५/(प्र.क्र.२९३/१०)/म.प्र., दि.३० /११/२०१६ चे सहपत्र.**

सुधारीत अंदाजपत्रक उपशीर्षवार तरतुदी ( प्रथम सुप्रमा )

| अ.क्र. | उपशिर्ष | सुधारीत प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये कोटी) |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १) | अ- प्राथमिक | ०.८६ |
| २) | ब- भूसंपादन | ८२.८६ |
| ३) | सी-कामे | ३९१.४८ |
| ४) | के- इमारती | ०.९८ |
| ५) | एम- लागवड | १.३५ |
| ६) | ओ- संकिर्ण | १.१२ |
| ७) | पी- देखभाल | ५.२३ |
| ८) | क्यु-हत्यारे व अवजारे | ०.१९ |
| ९) | आर- दळणवळण | १३०.४० |
| १०) | एक्स- पर्यावरण | ६.११ |
|  | **एकूण कामाप्रित्यर्थ** | **६२०.५८** |
|  | **आस्थापना व अनुषंगिक खर्च** | **७८.९०** |
|  | **एकूण** | **६९९.४८** |